**बॉंबे सबर्बन आर्ट ॲन्ड क्राफ्ट एज्युकेशन सोसायटी संचलित एल.एस.रहेजा स्कूल ऑफ आर्ट, वांद्रे, मुंबई या कला महाविद्यालयाच्या व्यवस्थापन हस्तांतरण व स्थलांतरणाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-१११९/प्र.क्र.९७/१८/तांशि-६**
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक:- ५ ऑक्टोबर, २०१८.

**<u>वाचा:-</u>**

१) बॉंबे सबर्बन आर्ट ॲन्ड क्राफ्ट एज्युकेशन सोसायटी यांचे पत्र क्रमांक एसओसी/११४/२०१८ दिनांक ७ फेब्रुवारी,२०१८.
२) अध्यक्ष, भारतीय ग्रामीण पुनर्रचना संस्था यांचे दिनांक २८ मार्च,२०१८ चे पत्र.
३) प्रभारी संचालक,कला संचालनालय यांचे पत्र क्रमांक डिओओ/२०१८/दोन/०९१० दिनांक ५ जून,२०१८.
४) प्रभारी संचालक,कला संचालनालय यांचे पत्र क्रमांक पिएआय/२०१८/दोन/१०७६ दिनांक २ जुलै,२०१८

**<u>प्रस्तावना:-</u>**

बॉंबे सबर्बन आर्ट ॲन्ड क्राफ्ट एज्युकेशन सोसायटी संचलीत एल.एस.रहेजा स्कूल ऑफ आर्ट या कला महाविद्यालयास अखिल भारतीय तंत्रशिक्षण मंडळाच्या (ए.आय.सी.टी.इ.) निकषांनुसार अभ्यासक्रम सुरू करावयाचे असल्यामुळे टप्प्या-टप्प्याने प्रचलित अभ्यासक्रम विनाअनुदानित करून बंद करावे, अशी विनंती सदर संस्थेने शासनास दिनांक ७ फेब्रुवारी,२०१८ च्या पत्रान्वये केली होती. मुलभूत अभ्यासक्रम, रेखा व रंगकला आणि उपयोजित कला या पदविका अभ्यासक्रमांसाठी लागणारी पुरेशी जागा संस्थेकडे उपलब्ध होऊ शकत नाही. तसेच, सदर अभ्यासक्रम अनुदानीत तत्वावर चालविण्यास संस्थेला अडचणीचे ठरत आहे. या कारणास्तव एल.एस.रहेजा स्कूल ऑफ आर्ट, वांद्रे या कला संस्थेचे व्यवस्थापन इतर कोणत्याही संस्थेस हस्तांतरित करण्यास हरकत नसल्याबाबत मानद सचिव, बॉंबे सबर्बन आर्ट अँड क्राफ्ट एज्युकेशन सोसायटी यांनी कळविले आहे. प्रस्तुत कला महाविद्यालय विनाअनुदानित तत्वावर परावर्तीत अथवा बंद न करता सक्षम कला संस्थेस, अनुदानासह हस्तांतरित करण्याची विनंती महाविद्यालयातील शिक्षक, शिक्षकेतर कर्मचारी व शिक्षक संघटनांनी शासनास वेळोवेळी केली. तसेच, यासंदर्भात विद्यार्थी आणि पालकांकडून देखील शासनास निवेदने प्राप्त झाली आहेत.

०२. एल.एस.रहेजा कला महाविद्यालयामध्ये शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होऊ नये तसेच, या संस्थेमधील कार्यरत शिक्षक / शिक्षकेतर कर्मचारी यांच्या सेवाविषयक बाबींचे संरक्षण व्हावे याकरिता या महाविद्यालयाच्या हस्तांतरणाशिवाय दुसरा विकल्प नसल्याचे नमूद करून त्याबाबतचा सविस्तर प्रस्ताव संचालक, कला संचालनालय यांच्या दिनांक २ जुलै,२०१८ च्या पत्रान्वये शासनास सादर करण्यात आला.

०३. कला संचालनालयाच्या नियंत्रणाखालील अनुदानीत कला संस्थांचे कामकाज "महाराष्ट्र राज्यातील मान्यताप्राप्त कला संस्थांसाठी अनुदान संहिता" या संहितेमधील तरतुदीनुसार चालविण्यात येते. तथापि, प्रचलित अनुदान संहितेमध्ये अनुदानित कला संस्थेच्या नावात बदल,

हस्तांतरण, स्थलांतरण यासंदर्भात सुस्पष्ट कार्यपध्दती नमूद करण्यात आलेली नाही. त्यामुळे विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होऊ नये व या कला महाविद्यालयातील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या सेवांचे संरक्षण व्हावे याकरिता उपाययोजना करण्यासाठी राज्य मंत्रीमंडळाच्या दिनांक २५ सप्टेंबर,२०१८ रोजी झालेल्या बैठकीत सविस्तर विचारविनिमय करण्यात आला व पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला.

**शासन निर्णयः-**

प्रस्तावनेमध्ये नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन एल.एस.रहेजा कला महाविद्यालयाचे व्यवस्थापन हस्तांतरण व स्थलांतरण या संदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे..

अ) बॉंबे सबर्बन आर्ट ॲन्ड क्राफ्ट एज्युकेशन सोसायटी संचलित एल. एस.रहेजा स्कूल ऑफ आर्ट, वांद्रे या अनुदानित कला संस्थेचे व्यवस्थापन मंजूर अुनदान, मंजूर विद्यार्थी संख्या आणि शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांसह भारतीय ग्रामीण पुनर्रचना संस्था, वडाळा मुंबई या संस्थेकडे हस्तांतरीत करण्यास विशेष बाब म्हणून मान्यता देण्यात येत आहे.

ब) एल. एस.रहेजा स्कूल ऑफ आर्ट, वांद्रे हे कला महाविद्यालय जे.के.नॉलेज सेंटर, नाडकर्णी पार्क, बी.पी.टी. हॉस्पीटलजवळ, वडाळा ( पूर्व) , मुंबई - ४०० ०३७ या ठिकाणी स्थलांतरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

क) एल. एस.रहेजा स्कूल ऑफ आर्ट, वांद्रे या संस्थेच्या नावात "जे.के. ॲकॅडमी ऑफ आर्ट ॲन्ड डिझाईन" असा बदल करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** सदर हस्तांतरण व स्थलांतरण खालील अटींच्या अधीनतेने करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

१) व्यवस्थापन हस्तांतरण करणाऱ्या संस्थेने प्रस्तावित हस्तांतरणानंतर आपले हक्क व अधिकार पुर्णपणे संपुष्टात येतील असे हमीपत्र द्यावे.

२) व्यवस्थापन ताब्यात घेणाऱ्या संस्थेने, प्रस्तावित हस्तांतरणानंतर संबंधित कला महाविद्यालयाच्या व्यवस्थापनाची जबाबदारी आपली असल्याचे हमीपत्र द्यावे.

३) उपरोक्त दोन्ही व्यवस्थापक संस्थांनी हस्तांतरणासंदर्भात शासनास हमीपत्र द्यावे.

४) नवीन व्यवस्थापनाच्या कामकाजात जुन्या व्यवस्थापनाचे नियामक मंडळ, विश्वस्त, संचालक, समिती यांचा हक्क असणार नाही.

५) हस्तांतरीत केलेली संस्था शासकीय नियमांप्रमाणे चालविणे नवीन व्यवस्थापनास आवश्यक राहील.

६) संस्थेतील विद्यार्थ्यांच्या अभ्यासक्रमानुसार त्यांची नावे, परीक्षांचे निकाल व फी बद्दलची माहिती जुन्या व्यवस्थापनाने नवीन व्यवस्थापनास द्यावी.

७) कर्मचारी वर्गाशी संबंधीत सेवाविषयक सर्व तपशिल, त्यांचे भविष्य निर्वाह निधी, ग्रॅच्युएटी, रजा, वेतन, सेवेच्या अटी व शर्ती इत्यादींची माहिती जुन्या व्यवस्थापनाने नवीन व्यवस्थापनास द्यावी.

८) हस्तांतरित कला महाविद्यालयाने शासकीय अनुदानातून खरेदी केलेली ग्रंथालयातील पुस्तके, फर्निचर, स्टेशनरी साहित्य, उपकरणे जडवस्तुसंग्रह नोंदवही, लेखाविषयक दस्तऐवज व नोंदवह्या, स्थावर व जंगम मालमत्ता, बँक खात्यांची माहिती , लेखा परीक्षण अहवाल यांची सविस्तर माहिती जुन्या व्यवस्थापनाने नवीन व्यवस्थापनास द्यावी.

संचालक, कला संचालनालय यांनी उपरोक्त अटींची पूर्तता करून घेऊन व्यवस्थापन हस्तांतरण व स्थलांतरणाची कार्यवाही त्वरीत पूर्ण करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१८१०१२१८०६०२०१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sandesh Rajaram Utekar

Digitally signed by Sandesh Rajaram Utekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=009789e9fe23fde06096381e43bebecd32b5c692c899745eee7d89d805005a87, cn=Sandesh Rajaram Utekar
Date: 2018.10.12 18:08:40 +05'30'

**(सं.रा.उतेकर)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२) मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
३) सचिव, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई.
४) संचालक, कलासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
७) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९) निरिक्षक, चित्रकला व शिल्प, मुंबई.
१०) मानद सचिव, बॉम्बे सबर्बन आर्ट ॲन्ड क्राफ्ट एज्यूकेशन सोसायटी, रहेजा एज्युकेशन कॉम्पलेक्स, कोलगेट मैदाना समोर, खेर नगर, वांद्रे (पू.), मुंबई- ४०० ०५०.
११) अध्यक्ष, भारतीय ग्रामीण पुनर्रचना संस्था,जे.के.नॉलेज सेंटर, नाडकर्णी पार्क, बी.पी.टी. हॉस्पीटलजवळ, वडाळा ( पूर्व) , मुंबई - ४०० ०३७
१२) निवड नस्ती, कार्यासन तांशि-६.